राजीव आवास योजना
राज्यस्तरीय झोपडपट्टीमुक्त शहर
तांत्रिक कक्ष स्थापन करणेबाबत..

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग
शासन निर्णय क्र.राआयो-२०१०/प्र.क्र.१५१/गृनिधो-२(सेल)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि.१९.०१.२०११

वाचा : १.राजीव आवास योजना व झोपडपट्टी मुक्त शहरांचा आराखडा तयार करण्याकरीता केंद्र शासनामार्फत निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना
२. शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्र.राआयो-२०११/प्र.क्र.४/गृनिधो-२(सेल), दि.१३.०१.२०११

**शासन निर्णय**

प्रस्तावित राजीव आवास योजनेंतर्गत झोपडपट्टीमुक्त शहरांचा आराखडा तयार करण्याकरीता केंद्र शासनाव्दारे प्रारुप मार्गदर्शक तत्वप्रणाली निर्गमित करण्यात आली आहे. सदर तत्वप्रणालीनूसार राजीव आवास योजनेच्या पूर्व-तयारीमध्ये झोपडपट्यांच्या सर्व्हेक्षणाचे काम महत्वाचे असून त्यांकरीता जी.आय.एस.मॅपिंग, CARTOSAT इमेजींग इत्यादी आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करणे व त्याकरीता राज्यस्तरावर तसेच ज्या नागरी स्वराज्य संस्था राजीव आवास योजना राबविण्याकरीता प्रस्तावित आहेत, त्यांच्या स्तरावर झोपडपट्टीमुक्त शहर तांत्रीक कक्ष स्थापन करणे अभिप्रेत आहे. त्यानूसार राजीव आवास योजना राबविण्याकरीता ज्या नागरी स्वराज्य संस्थांची निवड करण्यात आलेली आहे, त्या नागरी स्वराज्य संस्थांना त्यांचे स्तरावर तांत्रिक कक्ष स्थापन करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत. त्याच अनुषंगाने या आदेशाव्दारे प्रधान सचिव (गृहनिर्माण) यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय झोपडपट्टीमुक्त शहर तांत्रिक कक्ष महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (राज्यस्तरीय सुकाणू अभिकरण) स्तरावर स्थापन करण्यात येत आहे. तसेच सदर कक्षामध्ये खालील विशेषज्ञ सदस्याची पदें निर्माण करण्यात येत आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | एम.आय.एस.स्पेशालिस्ट | - | १ |
| २) | जी.आय.एस.स्पेशालिस्ट | - | १ |
| ३) | टाऊन प्लानिंग स्पेशालिस्ट | - | १ |
| ४) | स्पेशल डेव्हलपमेंट स्पेशालिस्ट | - | १ |
| ५) | प्रोजेक्ट इंजीनिअरींग स्पेशालिस्ट | - | १ |
| ६) | कॅपॅसिटी बिल्डींग/ट्रेनिंग का-ऑर्डीनेटर | - | १ |

२. सदर पदे ही कंत्राटी पध्दतीने, संबंधित विषयांमध्ये पदवी/पदव्योत्तर पदवी मिळविलेल्या उमेदवारांमधून वर्तमानपत्रांमध्ये जाहीरातींव्दारे अर्ज मागवून त्यातून निवड केलेल्या उमेदवारांमधून तसेच राज्य व राष्ट्रीय स्तरावरील संस्थामधून तसेच विविध शासकीय विभागातील शैक्षणिक अर्हता प्राप्त अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील. उमेदवारांची शैक्षणिक पात्रता व अनुभव लक्षात घेवून त्यांचे एकत्रित मानधन ठरविण्यात येईल. परंतु सदर एकत्रित मानधन दरमहा रु.७५,०००/- च्या मर्यादेत असावे. सदर कक्षांची स्थापना व त्यांतील तज्ज्ञांना मानधन देण्याकरीता येणारा खर्च राजीव आवास योजनेकरीता केंद्रशासनामार्फत देण्यात येणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येईल.

३. राज्यस्तरीय झोपडपट्टीमुक्त शहर तांत्रीक कक्ष हा नागरी स्वराज्य संस्थांच्या स्तरावर स्थापन करण्यात यावयाच्या तांत्रिक कक्षांची शिखर संस्था म्हणून काम करेल, नागरी स्वराज्य संस्थांच्या

स्तरावरील झोपडपट्टीमुक्त शहर तांत्रीक कक्ष व राज्य व राष्ट्रीय स्तरावरील संस्थामधील समन्वय तसेच राज्यशासन व सुकाणू अभिकरणामार्फत वेळोवेळी सोपविण्यात येणारी कामे करील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०११९२०१५१९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

( प्र.पु.बडगेरी )
अवर सचिव, गृहनिर्माण विभाग

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, (पत्राने)
२. मा.मख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
६. मुख्य अभियंता-२, राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, जेएनएनयुआरएम, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
७. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, नागपूर,
९. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोंकण विभाग, नवी मुंबई,
१०. उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा कोंकण विभाग, नवी मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१२. वित्त नियंत्रक / मुख्य अभियंता-१, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे, मुंबई-४०० ०५१.
१४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१५. मुख्य अधिकारी, पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, पुणे/नाशिक/ औरंगाबाद /नागपूर,
१६. वित्त विभाग (व्यय-३ कार्यासन, अर्थसंकल्प १७ व अर्थोपाय कार्यासन), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७. नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८. सामाजिक न्याय व सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२१. उप संचालक (एम) भारत सरकार, शहर कार्या आणि रोजगार मंत्रालय, शहरी रोजगार व दारिद्रय निर्मुलन विभाग( संनियंत्रण कक्ष) निर्माण भवन, नवी दिल्ली (नोंदणीकृत डाकेने)
२२. सह संचालक, लेखा व कोषागारे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई,
२३. उप सचिव / सर्व अवर सचिव /कक्ष अधिकारी , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२४. अवर सचिव/रोखशाखा व आहरण व संवितरण अधिकारी , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
२५. निवड नस्ती / गृनिधो-२(सेल) कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.